**महाडिबीटी प्रणालीच्या अनुषंगाने राज्यातील शासकीय व अनुदानित महाविद्यालये, शासन मान्यता प्राप्त खाजगी विना अनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये, शिक्षण संस्थामधील व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेशित अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या शिक्षण शुल्क, परीक्षा शुल्काच्या प्रतिपूर्तीबाबत..**

महाराष्ट्र शासन
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : अजाप्रि-२०१९/प्र.क्र.३३९/शिक्षण-१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: ०२ मार्च, २०२०**

वाचा:-

१. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. टीईएम-२०१५/ प्र.क्र.२१९/ तांशि-४, दिनांक ३१.०३.२०१६
२. शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.विभाग क्र. ईबीसी-२०१६/ प्र.क्र.२२१/शिक्षण-१, दि.३१.०३.२०१६
३. शासन परिपत्रक,सा.न्या.व वि.स.विभाग क्र.सीबीसी-१२/२००८/ प्र.क्र.४२७/शिक्षण-१, दिनांक ३१.७.२००८
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (मातं) क्र. ईबीसी-२०१८/ प्र.क्र.१३८/ एस-१/३९, दिनांक १२.१०.२०१८
५. शासन परिपत्रक, सा.न्या.व वि.स.विभाग क्र. ईबीसी-२०१८/ प्र.क्र.४८४/शिक्षण-१,दि.८.१.२०१९

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभाग, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, कृषी, पशुसंवर्धन दुग्ध व्यवसाय आणि मत्स्य व्यवसाय विभाग या विभागाच्या अधिपत्याखाली मान्यताप्राप्त खाजगी विनाअनुदानित व कायम विनाअनुदानीत संस्थेमध्ये प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शैक्षणिक वर्ष २००६-०७ पासून घेण्यात येवून, सदर निर्णय शैक्षणिक वर्ष २००७-०८, २००८-०९, २००९-१०, २०१०-११, २०११-१२, २०१२-१३, २०१३-१४ व सन २०१४-१५ मध्ये कायम ठेवण्यात आला. तसेच उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दिनांक ३१ मार्च २०१६ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, व इतर मागास प्रवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना सदरहू शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती योजना शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून पुढे सुरु ठेवण्याबाबतचा निर्णय दिनांक ३१.०३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे.

२. दरम्यान, राज्यातील वैयक्तिक लाभ, आर्थिक सहाय्य आणि सेवा यांचे वितरण करण्यासाठी माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने थेट लाभ हस्तांतरण (महाडीबीटी) प्रणाली विकसित केली असून सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून पहिल्या टप्यात एकूण सहा विभागाच्या अधिनस्त असलेल्या केंद्र व राज्य पुरस्कृत मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती, शैक्षणिक शुल्क- परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजना इ. ३९ योजनांची

अमंलबजावणी महाडीबीटी प्रणालीमधून करण्याचा निर्णय माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने दिनांक १२.१०.२०१८ च्या शासन निर्णयान्वये घेतला असून, त्याची राज्यात अंमलबजावणी करण्यात येत आहे.

२.१ सदरील शासन निर्णयानुसार महाडीबीटी प्रणालीवर महाविद्यालय/अभ्यासक्रम मॅपिंग (समावेश) करणे, महाविद्यालयनिहाय मंजूर अभ्यासक्रम व त्याची मंजूर प्रवेश क्षमता अपलोड करणे व ती वेळीवेळी अद्ययावत करणे, त्याबाबत ऑनलाईन तपासणी करणे, भविष्यात प्रणालीवर नोंद झालेले महाविद्यालय बंद झाल्यास वा अभ्यासक्रम बंद झाल्यास अथवा महाविद्यालयाची मान्यता काढून घेण्यात आल्यास, त्याअनुषंगाने महाडीबीटी प्रणालीवर आवश्यक ते बदल/ दुरुस्त्या करणे इ.जबाबदारी ही संबंधित प्रशासकीय विभाग (शालेय शिक्षण विभाग, शालेय माध्यमिक व उच्च माध्यमिक विभाग, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, वैदयकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, कृषी विभाग, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय आणि मत्स्य व्यवसाय विभाग इ.) व त्यांच्या अधिनस्थ कार्यालयांवर निश्चित करण्यात आलेली आहे.

२.२ सन २०१८-१९ या वर्षामध्ये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातंर्गत अनुसुचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांकरिता राबविण्यात येणाऱ्या शैक्षणिक शुल्क-परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजनेची महाडिबीटी प्रणालीवर अंमलबजावणी ही या विभागाच्या दिनांक ३१.०३.२०१६ रोजी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील निकषानुसार करण्यात येत आहे. सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापूर्वी शिक्षण शुल्क-परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजने अंतर्गत अनुज्ञेय असलेले विधी अभ्यासक्रमातील एलएलबी (३वर्षे), एलएलबी (५वर्षे), बी.एड, बी.पीएड, एम.एड, एम.पीएड हे अभ्यासक्रम विभागांतर्गत "महाईस्कॉल" प्रणालीवर "अव्यावसायिक अभ्यासक्रम" म्हणून नोंदविण्यात आलेले होते. दरम्यान, उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अनुक्रमे दिनांक २४एप्रिल,२०१७ व दिनांक २१जानेवारी,२०१६ च्या अधिसूचनांन्वये सदरील अभ्यासक्रम हे "व्यावसायिक अभ्यासक्रम" म्हणून घोषित करण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने सदर अभ्यासक्रमात शिकत असलेल्या अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना "व्यावसायिक अभ्यासक्रम" म्हणून शिक्षण शुल्क-परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजनेचा लाभ देणे आवश्यक आहे. उच्च शिक्षण विभागाने सदरील अभ्यासक्रम "व्यावसायिक अभ्यासक्रम" म्हणून महाडीबीटी प्रणालीवर मॅपिंग (समावेश) करुनही, तसेच सदरील अभ्यासक्रमांकरीता शिक्षण शुल्क परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजना अनुज्ञेय असूनही, महाडीबीटी प्रणालीवरील निर्माण झालेल्या संभ्रमामुळे अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना महाडीबीटी प्रणालीवर सदर योजनेअंतर्गत अर्ज नोंदणीकृत करता येत नसल्याची तसेच संबंधित महाविद्यालयांना सदर अभ्यासक्रमांचे अर्ज नुतनीकरण करता येत नसल्याची बाब निदर्शनास आली आहे. त्याचबरोबर, उच्च व तंत्रशिक्षण विभागामार्फत नव्याने "अव्यावसायिक अभ्यासक्रम" हे "व्यावसायिक अभ्यासक्रम" म्हणून घोषित केलेल्या अभ्यासक्रमांबाबत देखील याच प्रकारचे संभ्रम विद्यार्थी व महाविद्यालयांमध्ये निर्माण झालेला आहे. यामध्ये प्रामुख्याने राज्यभरात राबविण्यात येणारे बीबीए, बीसीए, बीबीएम, बीएससी (कॅम्प्यु.सा.), एमएससी (कॅम्प्यु.सा.), एमसीए (कॉमर्स), एमसीए (सायन्स) इ. अभ्यासक्रमांबाबत राज्य भरातील अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थी व पालकांमध्ये संभ्रम निर्माण झाल्याची बाब निदर्शनास आली आहे. या पार्श्वभूमीवर संदर्भीय दिनांक ३१.३.२०१६ रोजीच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने सुधारीत सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

३. उच्च व तंत्र शिक्षण विभाग तसेच अन्य प्रशासकीय विभागामार्फत राज्यातील शासकीय व अनुदानित महाविद्यालये, शासन मान्यता प्राप्त खाजगी विना अनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये / शिक्षण संस्थामधील "अव्यावसायिक अभ्यासक्रम" हे "व्यावसायिक अभ्यासक्रम" घोषित केल्यास वा नव्याने "व्यावसायिक अभ्यासक्रमांचा" समावेश केल्यास, अशा महाडिबीटी प्रणालीवर मॅपिंग केलेल्या व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेशित अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना, शैक्षणिक शुल्क-परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील. सदर शैक्षणिक लाभ हा, संबंधित प्रशासकीय विभागाने महाडिबीटी प्रणालीवर व्यावसायिक अभ्यासक्रम ज्या शैक्षणिक वर्षापासून नोंद केलेला असेल, त्या शैक्षणिक वर्षापासून लागू राहील.

३.१ अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना राज्यातील शासकीय व अनुदानित महाविद्यालये, शासन मान्यता प्राप्त खाजगी विना अनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये / शिक्षण संस्थामधील व्यावसायिक अभ्यासक्रमांकरीता शैक्षणिक शुल्क-परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजनेचा लाभ घेण्यासाठी सक्षम प्राधिकारी यांच्याकडील जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील.

३.२ अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना राज्यातील शासकीय व अनुदानित महाविद्यालये, शासन मान्यता प्राप्त खाजगी विना अनुदानित व कायम विनाअनुदानित महाविद्यालये / शिक्षण संस्थामधील व्यावसायिक अभ्यासक्रमांकरीता शैक्षणिक शुल्क-परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजनेच्या लाभाकरीता, वरील सुधारणांसह संदर्भीय दिनांक ३१.३.२०१६ च्या शासन निर्णयामधील उर्वरीत अटी व शर्ती लागु राहतील.

३.३ सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्क-परिक्षा शुल्क प्रतिपूर्ती योजनेच्या अंमलबजावणीबाबत महाडिबीटी प्रणालीवरील कार्यवाही ही संदर्भीय दि.१२.१०.२०१८ व दि. ८.१.२०१९ च्या शासन निर्णय व शासन परिपत्रका नुसार करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०२१६०८५०२८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINGLE DINESH RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032, street=151 ANNEX,1ST FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fc344849650ce07c3f9adc7e2cd4976b2852065e2acd65f7cee1828c10091458, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DINGLE DINESH RAMCHANDRA
Date: 2020.03.02 17:26:31 +05'30'

(दि.रा.डिंगळे)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, सामाजिक न्याय, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,

४. मा.मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
५. मा.मंत्री, उच्च व तंत्र व शिक्षण, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
६. मा.मंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
७. मा.मंत्री, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
८. मा.मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
९. मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
१०.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.प्रधान सचिव (पदुम), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.प्रधान सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८.आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९.संचालक, वि.जा.भ.ज., इ.मा.व. व वि.मा.प्र. संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०.संचालक, उच्च व तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१.संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२२.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई. (प्रसिध्दीसाठी)
२३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२४.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर .
२५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२६.प्रादेशिक उपायुक्त/सहायक आयुक्त, समाजकल्याण,सर्व प्रादेशिक विभाग
२७.निवड नस्ती (शिक्षण-१)